केंद्र शासनाच्या प्रारुप कायद्यातील तरतूदीच्या अनुषंगाने महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी शिफारस करण्याकरीता “मंत्रिमंडळ उपसमिती” गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं-१११८/प्र.क्र.२०४/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १० डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने Agricultural Produce and Livestock Marketing (Promotion & Facilitation) Act, २०१७ (Model Act) प्रकाशीत केला आहे. केंद्र शासनाच्या प्रारुप कायद्यातील तरतूदीच्या अनुषंगाने महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मध्ये सुधारणा करण्याबाबत सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २४ दिनांक २५ ऑक्टोबर, २०१८ रोजी प्रख्यापित करण्यात आला होता. या अध्यादेशाचे अधिनियमात रुपांतर करण्याकरिता सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात याबाबत सन २०१८ चे विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मांडण्यात आले होते. याबाबत महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक ६४ विधानसभेत दिनांक २७ नोव्हेंबर, २०१८ रोजी संमत झाले आहे. सदर विधेयकातील तरतुदीबाबत राज्यातील व्यापारी वर्ग तसेच लोकप्रतिनिधी यांचेकडून सुधारणा करणेबाबत मागणी करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने सदर विधेयकामध्ये शासनास काही सुधारणा करावयाची असल्यामुळे महाराष्ट्र विधानपरिषदेमधील विधेयक मागे घेण्यात आले आहे. सन २०१८ चे विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मधील तरतूदीमध्ये सुधारणा करण्याबाबतचा प्रस्ताव दिनांक २९.११.२०१८ रोजी मा. मंत्रिमंडळाच्या विचारार्थ सादर करण्यात आला. त्या अनुषंगाने दिनांक २९.११.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत मा. मंत्रिमंडळाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

"मंत्रिमंडळाने प्रस्तावावर विचार केला. यासंदर्भात मंत्रिमंडळाने एक उपसमिती गठित करण्याचा निर्णय घेतला. या उपसमितीला यासंदर्भातील विधेयक अंतिम करुन, सभागृहासमोर मांडण्याचा अधिकार असेल. राज्य विधानमंडळाच्या चालू अधिवेशनात यासंदर्भातील विधेयक सादर करणे शक्य न झाल्यास, त्यासंदर्भातील अध्यादेश काढण्यासंदर्भात यथोचित निर्णय घेण्याचा अधिकार उप समितीस असेल, याकरिता असा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी फेरसादर करण्याची आवश्यकता असणार नाही." सदर निर्णयाच्या अनुषंगाने मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम, १९६३ मध्ये सुधारणा करण्याबाबत सन २०१८ चे महाराष्ट्र विधानसभा विधेयक क्रमांक ६४ मध्ये सुधारणा करण्याबाबत शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | मा.ना.श्री. सुभाष देशमुख, मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) | - अध्यक्ष |
| २) | मा. ना. श्री. चंद्रकांत (दादा) पाटील, मंत्री (महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), कृषि, फलोत्पादन) | - सदस्य |
| ३) | मा.ना.श्री.प्रकाश महेता, मंत्री (गृहनिर्माण) | - सदस्य |
| ४) | मा.ना.श्री. सदाशिव खोत, राज्यमंत्री (कृषि व फलोत्पादन, पणन, पाणीपुरवठा व स्वच्छता) | - सदस्य |
| ५) | मा. मुख्य सचिव | - सदस्य |
| ६) | प्रधान सचिव (पणन) | - सदस्य सचिव |

२. उपरोक्त मंत्रिमंडळ उपसमितीस यासंदर्भातील विधेयक अंतिम करुन, सभागृहासमोर मांडण्याचा अधिकार असेल. राज्य विधानमंडळाच्या चालू अधिवेशनात यासंदर्भातील विधेयक सादर करणे शक्य न झाल्यास, त्यासंदर्भातील अध्यादेश काढण्यासंदर्भात यथोचित निर्णय घेण्याचा अधिकार उप समितीस असेल, याकरिता असा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी फेरसादर करण्याची आवश्यकता असणार नाही.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१०१७०५४७७२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant
Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.12.10 17:12:02 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून), कृषि, फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई
६) मा. राज्यमंत्री (कृषि व फलोत्पादन, पणन, पाणीपुरवठा व स्वच्छता) मंत्रालय, मुंबई
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (पणन) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (२१-स).